आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभागाच्या अखत्यारीतील प्लॉट नं. २, सर्व्हे नं २२९, मातृदुग्धशाळा, कुर्ला येथील ८.५ हेक्टर येथील जमीन धारावी पूनर्वसन प्रकल्प/झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणास हस्तांतरीत करणेकरिता **महसूल व वन विभागाकडे प्रत्यार्पित करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एएमसी-२०२४/प्र.क्र.८६/पदुम १०,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- १० /०६/२०२४.

**संदर्भ :-** १. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.एमएलके- २००१/प्र.क्र.३७६ /२००१/पदुम-१०, दि.११.११.२००२
२. गृहनिर्माण विभाग शासन निर्णय क्र.धापुप्र-२०१८/प्र.क्र.९०/झोपसु दि.०५/११/२०१८
३.महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. जमीन-२६२४/प्र.क्र.४०/ज-३ दि.१५/०३/२०२४
४. महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक क्र.जमीन-०४/२००६/प्र.क्र.३५/ ज-१,दि.०८/०९/२००८.

**प्रस्तावना :-**

शासनाने सन २००२ पासून दुग्धव्यवसायातून टप्प्याटप्प्याने बाहेर पडण्याचा निर्णय घेतला आहे. सद्यस्थितीमध्ये राज्यातील शासनाचे दूध संकलन निरंक असून, भविष्यात शासनाची भूमिका दूध संकलन व वितरणाची नसून नियमन/नियंत्रणाची राहणार आहे. त्यामुळे मातृदुग्धशाळा, कुर्ला येथील प्रकल्प बंद अवस्थेत असल्याने, सदर प्रकल्प भविष्यात सुरू केला जाण्याची शक्यता नसल्याने, सदर जागेची दुग्धव्यवसाय विकास विभागास आवश्यकता नाही.

२. महसूल व वन विभागाचा शासन निर्णय दि.०८ सप्टेंबर, २००८ नुसार शासकीय जमिनी महसूल विभागाच्या परवानगीशिवाय जमीन हस्तांतरणावर निर्बंध घालण्यात आले आहेत. महसूल व वन विभागाचा शासन निर्णय दि. १५ मार्च, २०२४ अन्वये मुंबईतील सार्वजनिक हिताच्या पायाभूत प्रकल्प (Public Vital Project) बाधितांच्या पुनर्वसनासाठी / पीएपी सदनीकांच्या बांधकामांसाठी शासकीय जमिनी सवलतीच्या दराने देणेबाबत धोरण निश्चित करण्यात आले आहे. त्यानुसार शासनाने मुंबई शहर व मुंबई उपनगर जिल्ह्यामध्ये विविध शासकीय विभागांना व त्यांच्या नियंत्रणाखालील शासकीय यंत्रणांना दिलेल्या शासकीय जमिनी सार्वजनिक हिताच्या पायाभूत प्रकल्पाने (Public / Vital Project) बाधित लोकांच्या पुनर्वसनाकरिता / पीएपी सदनिकांच्या बांधकामासाठी अशा शासकीय जमिनीची प्रचलित बाजार मुल्य दर तक्त्याप्रमाणे येणाऱ्या

किंमतीच्या (रेडी रेकनरच्या) २५ टक्के या सवलतीच्या दराने शासकीय व निमशासकीय संस्थांना / शासकीय प्राधिकरणांना व ज्यामध्ये शासन पूर्णत: किंवा अंशत: स्टेकहोल्डर आहे. जसे की म्हाडा, धारावी पुनर्वसन प्रकल्प अशा संस्थांना देण्यात याव्यात, अशी तरतुद करण्यात आली आहे.

३. गृहनिर्माण विभागाचा शासन निर्णय दि. ०५ नोव्हेंबर, २०१८ अन्वये धारावी पुनर्विकास प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी विशेष हेतु कंपनी (SPV) च्या माध्यमातून प्रस्तावित असलेल्या पुनर्वसन व पुनर्विकास योजनेचे महत्व आणि योजनेची अंमलबजावणी सुलभरितीने होण्याच्या दृष्टीने सदर विकास योजना “अत्यावश्यक नागरी प्रकल्प” (Vital Public Project) तसेच विशेष प्रकल्प म्हणून घोषित करण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे. त्यामुळे सदर प्रकल्पासाठी आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभागाच्या अखत्यारीतील प्लॉट नं. २, सर्व्हे नं २२९, मातृदुग्धशाळा, कुर्ला येथील ८.५१५ हेक्टर जमीन धारावी पुनर्विकास प्रकल्प, मुंबई यांच्याकडे हस्तांतरीत करण्याकरीता शासन निर्णय दि. १५ मार्च, २०२४ नुसार कार्यवाही होणे आवश्यक आहे. ही बाब विचारात घेता, गृहनिर्माण विभागाने मागणी केल्यानुसार आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभागाच्या अखत्यारीतील मातृदुग्धशाळा, कुर्ला येथील जमीन "धारावी पुनर्विकास प्रकल्पाचे मुंबई शहाराच्या दृष्टीने असलेले महत्त्व व या पुनर्वसन व पुनर्विकास योजनेस शासनाने "अत्यावश्यक नागरी प्रकल्प तसेच विशेष प्रकल्प म्हणून दिलेली मान्यता विचारात घेता, प्रस्तुत जागा धारावी पूनर्वसन प्रकल्प/झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणास हस्तांतरीत करणेकरिता सदर जमीन महसूल व वन विभागास प्रत्यार्पित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गृहनिर्माण विभागाने मागणी केल्यानुसार आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभागाच्या अखत्यारीतील प्लॉट नं. २, सर्व्हे नं २२९, मातृदुग्धशाळा, कुर्ला येथील ८.५ हेक्टर येथील जमीन "धारावी पुनर्विकास प्रकल्पाचे मुंबई शहाराच्या दृष्टीने असलेले महत्त्व व या पुनर्वसन व पुनर्विकास योजनेस शासनाने "अत्यावश्यक नागरी प्रकल्प तसेच विशेष प्रकल्प म्हणून दिलेली मान्यता विचारात घेता, प्रस्तुत जागा धारावी पूनर्वसन प्रकल्प/झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणास हस्तांतरीत करणेकरिता सदर जमीन महसूल व वन विभागास प्रत्यार्पित करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. मातृदुग्धशाळा, कुर्ला येथील जागेत सद्यस्थितीत दुग्धशाळा, कर्मचारी वसाहत, शीतगृह, मुख्य इमारत व इतर बांधकामे असून, सद्यस्थितीत कर्मचारी वसाहतीमध्ये शासनाच्या विविध विभागामधील अधिकारी/कर्मचारी राहत आहेत. त्यामुळे जागा हस्तांतरीत करतांना सदर अधिकारी/कर्मचारी यांची पर्यायी सोय करणे आवश्यक राहील.

३. मातृदुग्धशाळा, कुर्ला येथील जागा धारावी पुनर्विकास प्रकल्पास हस्तांतरीत करतांना महसूल विभागाने शासनाच्या प्रचलित धोरण, नियम /अटी व शर्ती यानुसार हस्तांतरीत करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६१०१७३९५६०७०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHWINI BHIMRAO YAMGAR

Digitally signed by ASHWINI BHIMRAO YAMGAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=f0b627b3230194fa84bd0e5b4eb590e81c2c15ce998ba19f4825b4ac3eee13ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1E31BE6F920A3D606925AB728A537257F35F1F0BE19B929C1B0DDCBA1E89366B, cn=ASHWINI BHIMRAO YAMGAR
Date: 2024.06.12 13:00:11 +05'30'

**( अश्विनी यमगर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उप मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (महसूल, पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय विभाग), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (महसूल),महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय विभाग),कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.
७. जिल्हाधिकारी,मुंबई उपनगर, मुंबई.
८. आयुक्त, दुग्धव्यवसाय विभाग, वरळी, मुंबई.
९. सह सचिव (ज-६),महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.
१०.निवडनस्ती (पदुम-१०).